सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पीय तरतुदीमधून राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानाच्या समान निधी योजनेसाठी अनुदान (अनिवार्य) वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक -मराग्रं-२०१८/प्र.क्र. १२६/२०१८/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १८ ऑगस्ट, २०१८.

वाचा : १) शासन परिपत्रक वित्त विभाग, क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३,दि. ०२.०४.२०१८.
२) ग्रंथालय संचालनालयाचे पत्र क्र.३१ /२०१८-१९/६५३९, दि.२०.०७.२०१८.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सांस्कृती मंत्रालयांतर्गत येणाऱ्या राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता यांचे अंशदान आणि राज्य शासनाचे अंशदान यांच्या संयुक्त सहभागाने ५०: ५० या प्रमाणातील निधीमधून राबविण्यात येणारी योजना ही समान निधी योजना म्हणून कार्यरत आहे. सन २०१८-१९ च्या अर्थसंकल्पात राज्य शासनाने राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या योजनेकरिता एकूण रु.२,५०,०००,००/-(रु.दोन कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. या योजनेअंतर्गत राज्यातील ग्रंथालयांना ग्रंथ, संगणक, झेरॉक्स मशीन, कपाटे, परिसंवाद व इमारत बांधकाम इ. बाबींवर खर्च करण्यासाठी निधी उपलब्ध करुन दिला जातो.

संदर्भ क्र १ येथील वित्त विभागाच्या परिपत्रकानुसार अर्थसंकल्पित तरतूदीच्या ७०% च्या मर्यादेत निधी खर्च करण्यास परवानगी दिलेली आहे. त्यानुषंगाने राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानच्या योजनेसाठी रु. १,७५,०००,०० /- (रुपये एक कोटी पंच्याहात्तर लाख फ़क्त) वितरीत करुन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय: -**

राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठान, कोलकाता, च्या समान निधी योजनेसाठी सन २०१८-१९ करिता राज्य शासनाचे अंशदानासाठी एकूण रु. २,५०,०००,००/-(रु.दोन कोटी पन्नास लाख फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. वित्त विभागाच्या दि. ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकानुसार अनिवार्य निधी खर्च करण्याची मर्यादा ७०% इतकी आहे. त्याअनुषंगाने राजा राममोहन रॉय प्रतिष्ठानच्या योजनेसाठी रु. १,७५,०००,०० /- (रुपये एक कोटी पंच्याहत्तर लाख फ़क्त) वितरीत करुन खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या दि. ०२.०४.२०१८ च्या परिपत्रकास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ८ मध्ये नमूद अटींची तसेच परिच्छेद ७ ते १८ मधील

अटींची पूर्तता होत आहे. सदरचा खर्च करण्यासाठी ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**३.** हा निधी मागणी क्रमांक डब्ल्यू-४, २२०५-कला व संस्कृती, १०५-सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (०२) राजा राममोहन रॉय ग्रंथालय प्रतिष्ठानासाठी अंशदान (अनिवार्य) (२२०५ ०३०४) ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली चालू वर्ष २०१८-१९ करीता उपलब्ध असलेल्या तरतुदीमधून भागविण्यात यावा. तसेच या अनुदानाच्या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे ग्रंथालयांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

**४.** हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८०८१८१५४७०६२४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dattatraya Rambhau Kahar

Digitally signed by Dattatraya Rambhau Kahar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bc29789a0057acb8ed170e1748553c17db300239c347be5264afbff5eb51fcac, cn=Dattatraya Rambhau Kahar
Date: 2018.08.18 15:50:16 +05'30'

**( द. रा कहार )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
२. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर
३. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
४. ग्रंथालय संचालक,ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नगर भवन, मुंबई.
५. ग्रंथपाल, राज्य मध्यवर्ती ग्रंथालय,मुंबई. (ग्रंथालय संचालनालयांमार्फत)
६. सचिव (उ.व.तं.शि.) यांचे स्वीय सहाय्यक
७. कक्ष अधिकारी, साशि-१, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती,साशि-५, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.